**पाच हजारावरील लोकसंख्येच्या गावांसाठी पर्यावरण विकास आराखडा तयार करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
शासन निर्णय क्रमांक व्हिपीएम २०११/प्र.क्र. १७३ /पंरा-४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक : २४ ऑगस्ट, २०११**

**वाचा :-** **१)** शासन निर्णय क्रमांक व्हिपीएम २६१०/प्र.क्र.१ /पंरा-४, दिनांक : १८ ऑगस्ट , २०१०
**२)** शासन निर्णय क्रमांक व्हिपीएम २६१०/प्र.क्र.१२९/पंरा-४, दिनांक: १६ सप्टेंबर, २०१०

**प्रस्तावना:-**

शासनाने पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजनेअंतर्गत या योजनेची उद्दिष्टे, निकष व योजनांतर्गत मिळणारा निधी व घ्यावयाची कामे या बाबत दिनांक १८ ऑगस्ट,२०१० रोजी शासन निर्णय प्रसृत केला आहे. त्यानुसार सन २०१०-११ मध्ये १२१९३ ग्रामपंचायतींनी पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेचे पहिल्या वर्षाचे निकष पूर्ण केलेले आहेत. त्यापैकी १०,००० पेक्षा जास्त लोकसंख्या असणाऱ्या आणि विकास केंद्र म्हणून विकसित करण्यात येणाऱ्या १५१ ग्रामपंचायती आहेत. या गावांसाठी पर्यावरण विकास आराखडा तयार करणे प्रस्तावित आहे.

शासन निर्णय दिनांक १६ सप्टेंबर,२०१० अन्वये मोठया ग्रामपंचायतीला नागरी सुविधासाठी विशेष अनुदान (विद्युतीकरणासह) योजनेतून पर्यावरण विकास आराखडा बनविण्याची तरतूद आहे. त्यानुसार ५००० पेक्षा जास्त लोकसंख्या असणाऱ्या गावांसाठी पर्यावरण विकास आराखडा तयार करण्यासाठी तांत्रिक सेवा पुरवठादार संस्थांची निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पर्यावरण विकास आराखडा तयार करण्यासाठी तांत्रिक सेवापुरवठादार संस्थांची निवड प्रक्रिया महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या सल्याने पूर्ण करण्यात आली असून निवडलेल्या संस्थांची यादी सोबत जोडलेल्या प्रपत्र-१ प्रमाणे आहे.

**१. ग्रामपंचायतींची निवडः-**

पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजनेत पहिल्या वर्षाचे निकष पूर्ण केलेल्या, खालील अटी पूर्ण करणाऱ्या ग्रामपंचायतींनी पर्यावरण विकास आराखडा तयार करावा.

**अ)** पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजनेत पहिल्या वर्षाचे निकष पूर्ण केलेल्या व लोकसंख्या १०००० पेक्षा जास्त असलेल्या ग्रामपंचायतींना पर्यावरण विकास आराखडा करणे बंधनकारक आहे.

**ब)** वरील अ) व्यतिरिक्त पर्यावरण संतुलीत समृध्द ग्राम योजनेत पहिल्या वर्षाचे निकष पूर्ण केलेल्या व लोकसंख्या ५००० चे वर आणि १०००० पेक्षा कमी असणाऱ्या व पर्यावरणीय संवेदनशील भागामध्ये समावेश होणाऱ्या, तिर्थक्षेत्र / पर्यटन क्षेत्र दृष्टया महत्व असणाऱ्या, औद्योगिक क्षेत्रात येणाऱ्या, प्रमुख नागरी क्षेत्राच्या ५ कि.मी. परिघामध्ये येणाऱ्या ग्रामपंचायती पर्यावरण विकास आराखडा करु शकतील.

**२. तांत्रिक सेवा पुरवठादार निवडः-**

पर्यावरण विकास आराखडा करण्यासाठी महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या सल्ल्याने निवडण्यात आलेल्या संस्थांच्या यादीमध्ये (प्रपत्र-१) समावेश असणाऱ्या संस्थांची तांत्रिक सेवा पुरवठादार म्हणून गाव निहाय निवड करण्यात यावी. यासाठी प्रत्येक जिल्हयामध्ये पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यात यावी.

| | | | |
|---|---|---|---|
| १) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - | अध्यक्ष | जिल्हयातील सर्व ग्रामपंचायतीसाठी |
| २) उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (ग्रा.पं.)जिल्हा परिषद | - | सदस्य सचिव | |
| ३) प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ | - | सदस्य | |
| ४) कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद (बांधकाम / पाणीपुरवठा) | - | सदस्य | |
| ५) सरपंच | - | सदस्य | निवडलेल्या प्रत्येक ग्रामपंचायतीसाठी |
| ६) गट विकास अधिकारी | - | सदस्य | |
| ७) ग्रामसेवक | - | सदस्य | |

संबंधीत ग्रामपंचायतीसाठी संस्था निवड करतांना उपरोक्त नमूद अनुक्रमांक ५,६ व ७ वरील सदस्य उपस्थित राहतील.

समितीच्या सदस्यांसाठी ग्रामविकास विभाग व महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ यांचे मार्फत कार्यशाळा आयोजित करुन संस्था निवडीसाठी आवश्यक ते तांत्रिक मार्गदर्शन करण्यात येईल. सदर समितीने प्रत्येक ग्रामपंचायतींनी सोबत जोडलेल्या प्रपत्र-१ मधील कोणत्याही किमान पाच संस्थांना आमंत्रित करुन व विहीत प्रक्रीयेचा अवलंब करून त्यातून एका संस्थेची निवड करणे आवश्यक आहे. तसेच प्रत्येक ग्रामपंचायतीना संस्था निवडीसाठी किमान तीन निविदा आल्या पाहिजेत या करिता आवश्यक तांत्रिक मापदंडासंबंधी महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या प्रादेशिक अधिकाऱ्यांची मदत घ्यावी. एका संस्थेला जास्तीत जास्त एका वर्षात फक्त दहा ग्रामपंचायतींचा आराखडा बनविण्यासाठी देता येईल.

**३. निधीः-**

परिच्छेद-१ मध्ये नमूद ग्रामपंचायतींनी पर्यावरण विकास आराखडा अंमलबजावणीसाठी शासन निर्णय दिनांक १६ सप्टेंबर, २०१० मध्ये नमूद केल्यानुसार अनुज्ञेय असणाऱ्या निधीचा वापर करावा. त्या व्यतिरिक्त जादा निधीची आवश्यकता भासल्यास स्वनिधीचा देखील वापर करता येईल. तसेच १०,००० च्या वरील ग्रामपंचायतीसाठी शासन निर्णय दिनांक १८ ऑगस्ट,२०१० मधील मुद्दा क्र. ६ (ब) मध्ये नमूद केल्याप्रमाणे पर्यावरण संतुलित समृध्द ग्राम योजनेचा निधी वापरता येईल.

**४. अंमलबजावणीः-**

संस्था निवड व पर्यावरण विकास आराखडा तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे कालमर्यादा राहील.

| अ क | कालमर्यादा | कृती | जबाबदारी |
|---|---|---|---|
| १ | १५ सप्टेंबर २०११ अखेर | जिल्हा स्तरीय समितीचे गठण | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद |
| २ | १५ सप्टेंबर २०११ ते ३० सप्टेंबर २०११ | समिती सदस्यांसाठी कार्यशाळा आयोजन. | ग्रामविकास विभाग, महाराष्ट्र शासन व महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ |
| ३ | ३० सप्टेंबर २०११ ते १५ ऑक्टोंबर २०११ | गठित समितींमार्फत गावांसाठी तांत्रिक सेवा पुरवठादार निवड | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व संबंधीत ग्रामपंचायत |

तांत्रिक सेवा पुरवठादार संस्था व ग्रामपंचायती यांनी पर्यावरण विकास आराखडा करण्यासाठी करावयाच्या करारनाम्याच्या अटी, शर्ती, नियम व संहिता या संबंधीच्या सविस्तर सुचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्यांचा संगणकीय संकेतांक २०११०८२४१६४३५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सुधीर ठाकरे)
**सचिव, ग्राम विकास**

**प्रति,**

१. माननीय राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. मंत्री व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
५. मा. विधान सभा व विधान परिषद सदस्य (सर्व)
६. मा. मुख्य सचिव
७. मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ
१०. विधी मंडळ ग्रंथालय, विधान भवन मुंबई (१० प्रती)
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीसाठी)
१२. सर्व विभागीय आयुक्त
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. संचालक, राज्य ग्रामीण विकास यंत्रणा (यशदा), पुणे
१५. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र .पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, संयुक्त प्रशिक्षण केंद्र.
१६. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
१७. महालेखापाल, महाराष्ट्र -१ नागपूर (लेखा व परिक्षा अनुज्ञेयता)
१८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१९. ग्राम विकास विभागातील सर्व उप सचिव
२०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
२२. संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई
२३. ग्रामविकास विभागातील सर्व कार्यासने व रोखशाखा
२४. निवडनस्ती, कार्यासन, पं. रा.-४(२२), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

**शासन निर्णय क्रमांक व्हिपीएम २०११/ प्र.क्र.१७३/ पं.रा.४ दिनांक २४ ऑगस्ट,२०११ सोबतचे प्रपत्र-१**

**पर्यावरण विकास आराखडा तयार करण्यासाठी निवडलेल्या संस्थांची यादी**

| अ.क्र. | संस्थेची यादी |
|---|---|
| १ | मे. कन्सलटींग इंजिनिअरिंग सर्व्हिसेस (इं) प्रा.लि. दिल्ली |
| २ | प्रायमुव्ह इंन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कन्सल्टंट प्रा.लि. , पुणे |
| ३ | दाराशॅव्ह ॲन्ड कं. प्रा. लि. मुंबई |
| ४ | फोर्ट्रेस इंन्फ्रास्ट्रक्चर ॲडव्हाजरी सर्व्हिसेस, मुंबई |
| ५ | ॲकशन फॉर फुड प्रोडक्शन (ॲफरो), अहमदनगर |
| ६ | आय आर जी सिस्टम्स साऊथ एशिया प्रा.लि., नवी दिल्ली. |
| ७ | पास्को एनव्हार्यमेंट सोल्युशन्स प्रा.लि. ,पुणे |
| ८ | इन्स्टिटेयूट आफ नॅचरल ऑरगॅनिक ॲग्रीकल्चर (इनोरा) , पुणे |
| ९ | रॅमकी एनव्हायरो इंजिनिअरिंग लि. हैद्राबाद |
| १० | ऐईकॉम इंडिया प्रा.लि., गुरगांव |
| ११ | फिडबॅक वेन्चर्स प्रायव्हेट लि., गुरगांव |
| १२ | डेटामेशन कन्सल्टंस प्रा.लि., दिल्ली |
| १३ | मे. महात्मा फुले समाज सेवा मंडळ (एमपीएसएसएम), सोलापूर |
| १४ | ॲग्रीकल्चर डेव्हलपमेंट ट्रस्ट, बारामती, पुणे |
| १५ | मे. जे.एम. एन्व्हीरॉनेट (पी) लि. गुरगांव |
| १६ | मे. सोसायटी फॉर एनव्हार्यमेंट ऑफ व्हिलेज आणि ॲग्रीकल्चर (सेवा), सातारा |
| १७ | व्होयंन्टस सोल्युशन प्रा.लि., गुरगाव |
| १८ | राष्ट्रविकास ॲग्रो एज्युकेशन संस्था, जळगांव |
| १९ | प्लॅनिग ॲन्ड रिसोर्स ऑन अर्बन डेव्हलपमेंट अफेअर्स (प्रुडा) , पुणे |
| २० | येरला प्रोजेक्टस सोसायटी, सांगली |
| २१ | मे.समर्थ असोसिएटस (जेव्हीई), पुणे |
| २२ | कंन्सोर्शियम फॉर डिव्हेटस् डिसएमिनेशन (सीडिडि) सोसायटी, बॅंगलोर |
| २३ | गजानन महाराज कृषि ॲन्ड शिक्षण संस्था, बुलढाणा. |
| २४ | हर्षल ग्रामीण विकास बहू संस्था, चंद्रपूर |

(सुधीर ठाकरे)

**सचिव, ग्राम विकास**